**पिटिशन फॉर लिव्ह टू सिव्हील अपील क्र.८५१९/२००६ प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशांच्या अनुषंगाने अनधिकृत धार्मिक स्थळांचे बांधकाम निष्कासित करणे / नियमित करणे / स्थलांतरित करणे या संबंधी कालबद्ध कार्यक्रम आखणे.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीटीएम ०२१५/प्र.क्र.७४/विशा-१ब,**
दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.
तारीख: २१ ऑक्टोबर, २०१५.

वाचा

(१) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक सीटीएम ०९०९/प्र.क्र.५५८(भाग-२)/विशा-१ब, दिनांक ५.५.२०११.

(२) गृह विभाग, शासन शुद्धीपत्रक क्रमांक सीटीएम ०२१५/प्र.क्र.७४/विशा-१ब,दिनांक १.७.२०१५.

प्रस्तावना :

मा.सर्वोच्च न्यायालयाने पिटिशन फॉर लिव्ह टू सिव्हील अपील क्र.८५१९/२००६ मध्ये अनधिकृत धार्मिक स्थळांची झालेली बांधकामे निष्कासित करणे, नियमित करणे किंवा स्थलांतरित करणे या संबंधी दिनांक २९.९.२००९ व त्यानंतर दिलेल्या निर्देशांच्या अनुषंगाने राज्य शासनाने धोरण निश्चित करुन अवैध धार्मिक स्थळांबाबतीत प्रत्येक अवैध धार्मिक स्थळनिहाय आढावा घेऊन अशी अनधिकृत धार्मिक स्थळे निष्कासित करणे, नियमित करणे किंवा स्थलांतरित करणेबाबत कालबद्ध कृती कार्यक्रम तयार करावा असे आदेश दिले आहेत.

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या सदर निर्देशानुसार राज्य शासनाने शासन निर्णय, गृह विभाग, दिनांक ५ मे, २०११ नुसार महानगरपालिका तसेच जिल्हास्तरावर समित्या नियुक्त केलेल्या आहेत. या समित्यांना सदर शासन निर्णयान्वये कार्यवाही करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत.

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या उपरोक्त नमूद आदेशांच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र. १०४/२०१० दाखल झालेली आहे. सदर याचिकेच्या सुनावणीदरम्यान मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी कार्यवाहीचे आदेश दिलेले आहेत. तथापि, मा.सर्वोच्च न्यायालय व मा.उच्च न्यायालयाच्या निदेशानुसार अनधिकृत धार्मिक स्थळांबाबत कारवाई होत नसल्याबाबत मा.उच्च न्यायालयाने नाराजी व्यक्त केली आहे. मा. उच्च न्यायालयाने यासंदर्भात दिनांक ०८ ऑक्टोबर, २०१५ रोजी दिलेल्या निदेशानुसार कार्यवाही करणे आवश्यक आहे.

या पार्श्वभूमीवर याबाबतचा कालबद्ध कार्यक्रम प्रसृत करुन त्याची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने कायदा व सुव्यवस्था, धार्मिक उत्सव व नागरीकांच्या भावना या सर्वांचा विचार करुन कालबध्द कार्यक्रम तयार केलेला आहे.

**शासन निर्णय**

(१) महानगरपालिका क्षेत्र व उर्वरित क्षेत्रामध्ये मा.सर्वोच्च न्यायालय व मा.उच्च न्यायालयाच्या अनधिकृत धार्मिक स्थळांबाबतच्या निदेशानुसार करावयाच्या कार्यवाहीचा कालबद्ध कार्यक्रम पुढीलप्रमाणे असेल :

| अ.क्र. | **दिनांक ०५.०५.२०११ च्या शासन निर्णयानुसार अनधिकृत धार्मिक स्थळांची वर्गवारी** | **करावयाची कार्यवाही व कालावधी** |
|---|---|---|
| १ | दिनांक २९.९.२००९ पूर्वीची नियमित करावयाची अनधिकृत धार्मिक स्थळे | कार्यवाही सुरू करुन ६ महिन्याच्या कालावधीत कार्यवाही पूर्ण करणे. |
| २ | दिनांक २९.९.२००९ पूर्वीची स्थलांतरित करावयाची अनधिकृत धार्मिक स्थळे | कार्यवाही सुरू करुन ६ ते ९ महिन्याच्या कालावधीत कार्यवाही पूर्ण करणे. |
| ३ | दिनांक २९.९.२००९ नंतरची निष्काषित करावयाची अनधिकृत धार्मिक स्थळे | कार्यवाही सुरू करुन एक वर्षाच्या कालावधीत कार्यवाही पूर्ण करणे. |
| ४ | दिनांक २९.९.२००९ पूर्वीची निष्काषित करावयाची अनधिकृत धार्मिक स्थळे | कार्यवाही सुरू करुन दोन वर्षाच्या कालावधीत कार्यवाही पूर्ण करणे. |

(२) उपरोक्त कार्यक्रमानुसार दिनांक ५ मे, २०११ च्या शासन निर्णयानुसार गठित समितीने या शासन निर्णयातील निर्देशांचे यथोचित पालन करुन, सर्व संबंधित यंत्रणांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी.

महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत धार्मिक स्थळांबाबत करावयाच्या कार्यवाहीची जबाबदारी महापालिका आयुक्त यांची राहिल.

जिल्ह्यातील महापालिका क्षेत्र वगळून उर्वरित क्षेत्रातील अनधिकृत धार्मिक स्थळांबाबतच्या करावयाच्या कार्यवाहीची जबाबदारी संबंधित जिल्हाधिका-यांची राहिल.

पोलीस आयुक्त व जिल्हा पोलीस अधिक्षक यांनी वरील कालबध्द कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी महानगरपालिका आयुक्त व जिल्हाधिकारी यांना आवश्यक तो पोलीस बंदोबस्त उपलब्ध करुन द्यावा.

उपरोक्त नुसार करण्यात येणाऱ्या कार्यवाहीचे विभागीय आयुक्तांनी नागरी व ग्रामीण भागांबाबत संनियंत्रण करावे व त्याबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महसूल व वन विभाग आणि नगर विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२११७३५४३६९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay D Patil

Digitally signed by Vijay D Patil
DN: CN = Vijay D Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.10.26 12:28:53 +05'30'

**( विजय पाटील )**
अवर सचिव, गृह विभाग

प्रत,

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग
४) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग
७) प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग
८) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग
९) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग
१०) सचिव, न.वि. (२), नगर विकास विभाग
११) मा.मुख्य सचिवांचे उप सचिव,
१२) सर्व महानगरपालिका आयुक्त
१३) सर्व जिल्हाधिकारी
१४) सर्व पोलीस आयुक्त
१५) सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
१७) मुख्याधिकारी, सर्व नगर परिषदा

१८) मा.मंत्री (महसूल) यांचे खासगी सचिव

१९) मा.राज्यमंत्री (गृह/शहरे) यांचे खासगी सचिव

२०) मा.राज्यमंत्री (गृह/ग्रामीण) यांचे खासगी सचिव

२१) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खासगी सचिव

२२) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव

२३) निवडनस्ती (विशा-१ब)